**श्री.विलास गणपतराव शिरोळकर यांची जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, अकोला या पदावरुन जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, भंडारा या पदावर बदलीने पदस्थापना देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आस्था -२०२२/प्र.क्र.३३९/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- २७ एप्रिल,२०२३.

**संदर्भ**:- १)महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आस्था-२०२०/प्र.क्र.६५/ई-६, दि.२१.०५.२०२०

**आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची त्यांच्या नावांसमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री.विलास गणपतराव शिरोळकर | जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, अकोला | जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, भंडारा |

२. सदर अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहीत केलेल्या कालावधीमध्ये पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन-१४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

३. सदर आदेश निर्गमित केल्यानंतर, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या **विहित अवधीतच**, सदर अधिकाऱ्यानी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या विहित कालावधीत पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा **“अकार्यदिन”**(dies non) म्हणून गणला जाईल, याची संबधितांनी नोंद घ्यावी.

४. सदर अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मुळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मुळ कार्यालयाकडे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून सदर पदस्थापना रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची सदर अधिकाऱ्यानी नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२७१८४१५७१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.04.27 18:50:02 +05'30'

**(संजय बनकर)**
**सह सचिव, महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.

**प्रत:**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई -३२
२) उपसंचालक भूमि अभिलेख, अमरावती प्रदेश, अमरावती.
३) उपसंचालक भूमि अभिलेख, नागपूर प्रदेश, नागपूर.
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) श्री.विलास गणपतराव शिरोळकर, जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख (द्वारा- जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.
६) कार्यासन ल-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
७) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.